**मा. न्यायमूर्ती, उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांचेकरिता खाजगी बंगला, शासकीय निवासस्थान म्हणून भाडेतत्वावर घेण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधी व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एचसीटी-५२१७/६४८/प्र.क्र.७४/का.चार**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ३१ जुलै, २०१७.

**संदर्भ :-**

१) प्रबंधक (प्रशासन), मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांची पत्रे क्र. CK/१०४२९/२०१७, दि. २५/०७/२०१७ व दि. २७/०७/२०१७.
२) कार्यकारी अभियंता, सा.बां. (पश्चिम) विभाग, औरंगाबाद यांचे पत्र क्र. जा.क्र. आरेखक / भाडे/३४४६, दि. १७/०७/२०१७.

**प्रस्तावना -**

औरंगाबाद या ठिकाणी शासकीय निवासस्थानांची कमतरता असल्याने नव्याने नियुक्त करण्यात आलेले मा. न्या. श्री. एस. एम. गव्हाणे यांची शासकीय विश्रामगृहात तात्पुरती राहण्याची व्यवस्था करण्यात आली आहे. उच्च न्यायालयाच्या न्यायमूर्तींच्या निवासव्यवस्थेबाबत, मा. मुख्य न्यायमूर्ती व मा. मुख्य सचिव यांच्या दि. २३/०६/२०१७ रोजी झालेल्या बैठकीत, शासकीय निवासस्थानांची उपलब्धता नसल्यास भाडेतत्वावर निवासस्थाने उपलब्ध करुन घेण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. त्यास अनुसरुन मा. न्या. श्री. एस. एम. गव्हाणे यांचेकरिता प्लॉट क्र. ३५६, सेक्टर N-१, सिडको, औरंगाबाद येथील खाजगी बंगला मा. न्यायमूर्तींकरिता शासकीय निवासस्थान म्हणून भाडेतत्वावर घेण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. कार्यकारी अभियंता, सा.बां. (पश्चिम) विभाग, औरंगाबाद त्याबाबतचे वाजवी भाडेप्रमाणपत्र सादर केले आहे. तसेच विभागीय आयुक्त तथा अध्यक्ष शासकीय निवासस्थान वाटप समिती, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद यांनी उपरोक्त निवासस्थान भाडेतत्वावर घेण्यास सहमती दर्शविली आहे. त्यानुसार प्रस्तुत प्रकरणी शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

उच्च न्यायालयाच्या मा. न्यायमूर्तींच्या दर्जानुरुप शासकीय निवासस्थानाची अनुपलब्धता विचारात घेऊन सद्यस्थितीत, मा. न्या. श्री. एस. एम. गव्हाणे यांची शासकीय विश्रामगृहात तात्पुरती राहण्याची व्यवस्था करण्यात आली आहे. उच्च न्यायालयाच्या न्यायमूर्तींच्या निवासव्यवस्थेबाबत, मा. मुख्य न्यायमूर्ती व मा. मुख्य सचिव यांच्या दि. २३/०६/२०१७ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयास अनुसरुन पर्यायी व्यवस्था म्हणून श्री. भरतेंदू वत्स यांच्या प्लॉट क्र. ३५६, सेक्टर N-१, सिडको, औरंगाबाद येथील खाजगी बंगला मा. न्यायमूर्तींकरिता शासकीय निवासस्थान **रु. ५५,०००/- (रुपये पंचावन्न हजार फक्त)** दरमहा दराने दि. ०१/०८/२०१७ ते दि. ३१/०७/२०१८ या कालावधीसाठी भाडेतत्वावर घेण्यास तसेच भाडेकरारातील अटीनुसार **रु. ३,३०,०००/- (रुपये तीन लाख तीस हजार फक्त)** इतकी रक्कम अनामत म्हणून अदा करण्यास खालील अटींच्या अधीन राहून मंजूरी देण्यात येत आहे.

१) मा. न्यायाधीशांना अनुज्ञेय असलेल्या निवासस्थानाचे क्षेत्रफळ विचारात घेऊन सदरहू बंगला भाडयाने घेण्यात यावा.

२) आयुक्त, औरंगाबाद यांचेकडून निवासस्थान उपलब्ध होत नसल्याचे प्रमाणपत्र घेण्यात यावे.

३) सदर बंगल्यास विद्युत जोडणी (Electric Wiring) तसेच पाण्याची जोडणी यावरील खर्च मालकाकडून घेण्यात यावा.

२. उपरोक्त भाडेकरार करण्यासाठी शासनाच्या वतीने सह सचिव, विधि व न्याय विभाग, औरंगाबाद यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. याप्रित्यर्थ होणारा अनावर्ती खर्च " मागणी क्र.जे-१, २०१४ - न्यायदान, १०२-उच्च न्यायालये, (०३) (०१) प्रबंधक, अपील शाखा, (२०१४ ००९२) १३ कार्यालयीन खर्च" या लेखाशीर्षाखाली सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातूत भागविण्यात यावा. तसेच आवर्ती खर्च सदर लेखाशीर्षाखालील संबंधित आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातूत भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र. ७८८/व्यय-५, दि. २९/०७/२०१७ अन्वये प्राप्त झालेल्या त्या विभागाच्या सहमतीने तथा सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७३११५१६२८४९१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjeev Rajaram Keluskar

Digitally signed by Sanjeev Rajaram Keluskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Low And Judiciary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4a521517a0d3fba83ff4473cb0d448a75f9b7f83cba41836833b60c93758c804, cn=Sanjeev Rajaram Keluskar
Date: 2017.07.31 15:22:15 +05'30'

**(संजीव केळुसकर)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, विधानभवन, मुंबई/नागपूर.
२. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई.
३. प्रबंधक (अपील शाखा), उच्च न्यायालय, मुंबई
४. प्रबंधक (प्रशासन), मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद, औरंगाबाद

५. सह सचिव, विधि व न्याय विभाग, औरंगाबाद (परिच्छेद २ मध्ये नमूद निदेशानुसार कार्यवाही करण्याच्या विनंतीसह)
६. महालेखापाल-२ (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
७. वरिष्ठ कोषागार अधिकारी, औरंगाबाद
८. श्री. भरतेंदू वत्स, प्लॉट क्र. ३५६, सेक्टर N-१, सिडको, औरंगाबाद
९. विधि व न्याय विभाग, कार्यासन २३, मंत्रालय, मुंबई
१०.निवड नस्ती.